महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ
मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील
बदलीबाबत..
डॉ. संजयकुमार भरमाप्पा साळुंखे

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदस्था - १३१४/प्र.क्र. ३९० (३) /सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १ सप्टेंबर,२०१४

**संदर्भ :-** शासन आदेश सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. बदली-२०१३/प्र.क्र.२३८(४२)/सेवा-२, दि. २५.६.२०१४

**शासन निर्णय -**

डॉ. संजयकुमार भरमाप्पा साळुंखे, वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, बेळंकी,जि.सांगली यांची संदर्भीय आदेशान्वये वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, दौंडाईचा, जि.धुळे येथे बदली करण्यात आली होती. सदर पदस्थापनेत महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) (एक) (दोन) व ४ (५) मधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदल करण्यात येत असून डॉ. साळुंख यांना पुढील प्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीचे कारण | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | डॉ. संजयकुमार भरमाप्पा साळुंखे, वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, बेळंकी, जि.सांगली | विनंतीनुसार | वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, चिंचणी वांगी, जि.सांगली ( रिक्त पदी ) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत त्यांनी नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे.जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

५. संचालनालयाने जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार सदर प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादत सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१४०८१४१३०१३४१७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JADHAV RAMCHANDRA S

Digitally signed by JADHAV RAMCHANDRA S
DN: CN = JADHAV RAMCHANDRA S, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.09.01 11:28:18 +05'30'

(रा.शं.जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
३) उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक / कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
७) जिल्हा शल्य चिकित्सक,सामान्य रुग्णालय, धुळे / सांगली
८) डॉ. संजयकुमार भरमाप्पा साळुंखे, वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रुग्णालय, बेळंकी, जि.सांगली
९) मा. मंत्री / मा.राज्यमंत्री ( सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव
१०) मा.प्रधान सचिव (सा.आ.),मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहायक
११) निवडनस्ती